GR-200407191256280001-2500



महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क. माविम-२००१/ प्र.क्र.१६७/का-१०
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - ३ ऑक्टोबर २००१.

**वाचा** - १) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-१०९६/ प्र.क्र. २०७/ का-२, दि. ९ जुलै ९८.
२) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-१०९९/ प्र.क्र.९४/ का-२, दि. ३ फेब्रुवारी ९९.
३) महिला व बाल विकास एकत्रित शासन निर्णय क्र.८१/ २००१/ मविषो-२०००/ प्र.क्र.४२९/ का-२, दि.२५.५.२००१

**प्रस्तावना** :- गरजू महिलांना घरबसल्या काम मिळावे व आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी होता यावे किंवा महिलांच्या सहाय्याने उत्पादनाकरीता असलेल्या महिला मंडळांना प्राधान्याने काम मिळावे या दृष्टिने संस्था नोंदणी अधिनियम १८६० तसेच सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० खाली नोंदणी झालेल्या महिला संस्थांना / महिला मंडळांना एकुण मागणीच्या ५०% काम निविदा न भरता संस्थांना देण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यातआले होते परंतु, असे निदर्शनास आले आहे की, अद्यापही महिला संस्थांना या आदेशाचा पाहिजे तसा उपयोग झालेला नाही. महिला धोरण - २००१ मध्ये माविमला महिला विकासाची कामे देण्याचे धोरण आहे. वरील पार्श्वभूमीवर माविमला समन्वय संस्था म्हणून नियुक्त करुन सध्या अस्तित्वात असलेल्या संदर्भांकित शासन निर्णयामध्ये सुधारणा करणे व त्याचे एकत्रिकरण करणे आवश्यक आहे. करीता संदर्भांकित दि. ९ जुलै ९८ आणि ३ फेब्रुवारी ९९ चे शासन निर्णय अंतर्भूत करुन सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :- १) जिल्हा परिषदा, नगरपालिका, महानगरपालिका, स्थानिक स्वराज्य संस्था, तसेच शासकीय विभाग व निमशासकीय संस्था, इ. ना व त्यांच्यामार्फत चालविण्यात येणाऱ्या सर्व संस्थांना लागणारे गणवेश, चादरी, उशांचे अभ्रे, रोग्यांचे कपडे, डस्टर, झाडु, तसेच

खाद्यपदार्थ, मसाले, लोणची, पापड स्वयंपाक घरासाठी आवश्यक जिनसा पुरविण्याचे ५०% पर्यंतचे काम नोंदणीकृत महिला संस्थांना देण्यात येतील अशी कामे मंजूर झालेल्या निविदेच्या (Valid tender) दरापेक्षा १० टक्के जास्त दरापर्यंत देण्यात येतील. सदर महिला संस्था ते काम त्यांच्या संस्थेच्या सदस्य असलेल्या गरजू महिलांमार्फत करुन घेतील. (अशी कामे निविदांच्या दरापेक्षा १० टक्के जास्त दरापर्यंत महिला संस्थांना देण्यात यावीत ) यासाठी अशा नोंदणीकृत महिला संस्थांना निविदेमध्ये भाग घेण्याची आवश्यकता असणार नाही. त्याचप्रमाणे ५० टक्के पर्यंतचे पुरवठा आदेश अशा

नोंदणीकृत महिला संस्थांना देण्याचे अधिकार राखून ठेवण्यात येत आहेत असा स्पष्ट उल्लेख निविदा प्रसिध्द करताना कटाक्षाने करण्यात यावा.

२. सदर महिला संस्था, महिला विश्वस्त कायदा १९५०, संस्था नोंदणी अधिनियम १८६०, सहकारी संस्था अधिनियम १९६० किंवा कंपनी अधिनियम १९५६ यापैकी कोणत्याही अधिनियमाखाली नोंदणीकृत झालेली असावी.

३. वरील बाबींपैकी गणवेष ही बाब सध्या भांडार खरेदी धोरणानुसार लघु उद्योग क्षेत्रातील लघु उद्योग घटकाकडून खरेदीसाठी राखीव आहे. चादर ही बाब केंद्र शासनाच्या निर्णयानुसार हातमाग क्षेत्रात मोडते. त्यामुळे महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ आणि महाराष्ट्र राज्य हॅण्डलूम को-ऑप. फेडरेशन (महाटेक्स ) यांच्याकडून खरेदीसाठी राखीव आहे. त्याचप्रमाणे चादर ही बाब कारागृहाकडून खरेदी करण्यासाठी आरक्षित बाब आहे. फिनेल, डस्टर, झाडू व साबण या बाबी सध्याच्या भांडार खरेदीच्या धोरणानुसार महाराष्ट्र खादी व ग्रामोद्योग मंडळ यांच्यासाठी आरक्षित आहेत. सदर बाबींची दरनिश्चिती मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेमार्फत आणि सक्षम विभागामार्फत केली जाते. वरील परिच्छेद-१ प्रमाणे आता या वस्तु/ बाबी कामधेनू योजनेखाली महिला संस्थांकडून सुध्दा खरेदी करता येतील. त्या बाबींचा जर दर करार मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेने अथवा सक्षम विभागाने केलेला असेल तर त्या वस्तुची ५० टक्के पर्यंतची खरेदी १० टक्के अधिक दराने करण्यात येऊ शकेल.

४. महिला संस्था / महिला मंडळे यांना शासकीय कार्यालये, निमशासकीय कार्यालये, जिल्हा परिषदा, नगरपालिका, महानगरपालिका, स्थानिक स्वराज्य संस्था, शासन अनुदानित संस्था यांचेकडील का मिळवून ते गरजू महिलांना उपलब्ध करुन देण्यासाठी महिला व बाल विकास विभागाकडील कोणत्याही प्रमाणपत्राची आवश्यकता राहणार नाही. तथापि अशा महिला संस्था किंवा महिला मंडळ हे नोंदणी अधिनियम १८६०, सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५०, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० किंवा कंपनी अधिनियम १९५६ यापैकी कोणत्याही एकातरी अधिनियमाखाली नोंदणी झालेली असणे बंधनकारक आहे.

५. <u>माविमची भूमिका</u> :- अ) मालाची मागणी करणाऱ्या संस्था आणि मालाचा पुरवठा करणाऱ्या महिला संस्था यांच्यामध्ये समन्वय साधण्याच्या दृष्टिने तसेच महिला संस्था खरोखरच महिलांसाठी काम करतात किंवा नाही याची शाश्वती देण्याच्या हेतूने तसेच मागणी करणाऱ्या संस्था, ५० खरेदी महिला संस्थांकडून करतात किंवा नाही व ५०% पुरवठा करणाऱ्या महिला संस्था महिलांकडून कामे करुन घेतात किंवा नाही आणि शासनाने केलेल्या निकषाचे पालन करतात किंवा नाही हे तपासण्याच्या दृष्टिने महिला आर्थिक विकास महामंडळास समन्वय संस्था म्हणून घोषित करण्यात येत आहे. महिला आर्थिक विकास महामंडळ सर्व अटी व शर्ती पूर्ण करणाऱ्या नोंदणीकृत संस्थेची महामंडळात पुरवठेदार संस्था म्हणून नोंदणी करुन घेईल त्यांना नोंदणी प्रमाणपत्र देईल. मालाची मागणी करणाऱ्या संस्थांनी माविमचे नोंदणी प्रमाणपत्र

सादर करणाऱ्या संस्थेसच मालाची ऑर्डर देणे बंधनकारक राहील. सदर महिला संस्था महिला कर्मचाऱ्यांकडूनच काम करुन घेतात किंवा नाही इ. बाबी तपासण्याची व त्यावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी माविमची राहील.

ब) महिला उद्योजक आणि महिला संस्था यांची नोंदणी माविमने ठरवून दिलेल्या निकषानुसार माविमकडे करण्यात यावी. नोंदणी शुल्क आकारण्याची मुभा माविमला राहील व अटी व शर्तीची पूर्तता न करणाऱ्या संस्थांची नोंदणी रद्द करण्याचे संपूर्ण अधिकार माविमला राहतील.

क) प्रत्येक जिल्हयातून नोंदविण्यात आलेल्या महिला संस्था / महिला मंडळाची यादी माविमने जिल्हा उद्योग केंद्रांना व जिल्हा महिला व बाल विकास समितीस उपलब्ध करुन द्यावी. तसेच परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या प्रत्येक शासकीय, निमशासकीय व स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या निविदेची प्रत जिल्हा उद्योग केंद्रास जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी आणि महिला आर्थिक विकास महामंडळाच्या विभागीय / जिल्हा कार्यालयास उपलब्ध करुन द्यावी.

ड) खाजगी उद्योजकांमार्फत पुरविण्यात येणाऱ्या उत्पादनाच्या व सेवांच्या संदर्भात जी कामे नगाच्या दराप्रमाणे केली जातात अशी कामे गरजू महिलांमार्फत घरबसल्या करुन घेण्यासाठी खाजगी उद्योजक कोणकोणती कामे गरजू महिलांकडून घरबसल्या करुन घेवू शकतील त्या कामाची व उद्योजकांची यादी संबंधित जिल्ह्यातील जिल्हा उद्योग केंद्राच्या मदतीने माविमने तयार करावीत व यादीची प्रत जिल्हा महिला बाल कल्याण समितीस व महिला संस्थांना उपलब्ध करुन दयावी. जी कामे खाजगी उद्योजक गरजू महिलांमार्फत घरबसल्या करु शकतील अशी कामे खाजगी उद्योजकांनी अशा गरजू महिलांमार्फत करुन घेणेबाबत उद्योग संचालकांनी संबंधित उद्योजकांना प्रवृत्त करावे. याकरीता माविमने उद्योजकांच्या मदतीने एक जाळे ( नेटवर्क ) तयार करावे.

इ) तंत्रज्ञान उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टिने शासकीय संस्थेचे सदस्य किंवा गरजू महिला यांचेकरीता विविध क्षेत्रात महिला आर्थिक विकास महामंडळाने प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करावेत. या प्रशिक्षणासाठी आवश्यक ते प्रशिक्षण शुल्क प्रशिक्षणार्थीकडून आकारण्याची मुभा माविमला राहील.

६. कामधेनू योजना परिणामकारकरित्या राबविण्यासाठी दि. ९ जुलै ९८ च्या संदर्भाकित शासन निर्णयात नियुक्त करण्यात आलेल्या जिल्हा उद्योग समितीअंतर्गत कामधेनू योजना उप समित रद्द करण्यात येत असून ही जबाबदारी माविमवर सोपविण्यात येत आहे. जिल्हा परिषदेअंतर्गत जिल्हा महिला बाल विकास समिती ही या योजनेची शिफारस व सनियंत्रण समिती म्हणून कार्य करील. या समितीच्या बैठकांमध्ये महिला आर्थिक विकास महामंडळाच्या प्रतिनिधीस निमंत्रित करण्यात यावे.

२. कामधेनू योजनेचा आढावा राज्य स्तरावर महिला सक्षमीकरण समितीमार्फत व जिल्हा स्तरावर जिल्हा महिला सक्षमीकरण समितीमार्फत घेण्यात येईल.

३. सर्व महानगरपालिका आणि नगर परिषदा यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी अशा

प्रकारच्या खरेदीसाठी आवश्यक त्या सुधारणा त्यांच्या अधिनियमात व नियमात कराव्यात. जेणेकरुन या शासन निर्णयाची अंमलबजावणी होवू शकेल.

९. सदर शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, ग्राम विकास विभाग, नियोजन विभाग आणि वित्त विभागाने यापूर्वीच्या शासन निर्णयात दिलेल्या संमत्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(चंद्रसेन तुरकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा. राज्यपालांचे सचिव.
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
सर्व मंत्रालयीन विभाग.
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा, मुंबई.
उद्योग विकास आयुक्त, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी.
सभापती, महिला व बाल विकास समिती जिल्हा परिषद (सर्व)
संचालक, नगरपालिका प्रशासन, नवीन प्रशासन भवन,
सर्व नगरपालिका
सर्व नगरपरिषदा.
महाराष्ट्र शासनाचे सर्व सार्वजनिक उपक्रम.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
सर्व विभागीय अधिकारी (महिला व बाल विकास).
सदस्य सचिव, महिला आयोग.
सचिव, समाज कल्याण सल्लागार बोर्ड.
महाव्यवस्थापक, यशदा, पुणे.
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ
निवड नस्ती, का-१०.